पॅरीस, फ्रान्स येथील ऑलिम्पिक स्पर्धेकरिता
पात्र ठरलेल्या राज्यातील खेळाडूंना आर्थिक
सहाय्य देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक: क्रीडायो-३०२४/प्र.क्र.७२/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १२ जुलै, २०२४

वाचा-

१. क्रीडा संचालनालयाचे पत्र क्र.क्रीयुसे/शिक्रीपी/मिल/खेआस/२०२४-२५/का-१३/८७२ दिनांक ०४/०७/२०२४

प्रस्तावना:-

महाराष्ट्र राज्यात क्रीडा संस्कृतीचे संवर्धन, प्रचार, प्रसार व जोपासना करण्यासाठी व प्रतिभावंत खेळाडू तयार करण्यासाठी शासन प्रयत्नशील आहे. महाराष्ट्र राज्याला क्रीडा संस्कृतीचा मोठा वारसा असून राज्याचे स्वतंत्र क्रीडा धोरण जाहीर करणारे महाराष्ट्र हे देशातील पहिले राज्य आहे. त्यामध्ये वेळोवेळी परिस्थितीनुसार झालेले क्रीडा बदल विचारात घेऊन सुधारीत धोरण निश्चीत करुन क्रीडा विकासाच्या भरीव योजनांची आखणी करण्यात आली. त्याचा परीणाम दिसून महाराष्ट्र राज्याचा क्रीडा क्षेत्रात अग्रगण्य राज्य म्हणून नावलौकीक झालेला आहे. गतवर्षामध्ये महाराष्ट्र राज्याने, देशपातळीवरील महत्वपूर्ण असलेल्या खेलो इंडीया युथ गेम्स व नॅशनल गेम्समध्ये देशपातळीवर प्रथम क्रमांकांचे यश संपादन केलेले आहे. तथापि आंतरराष्ट्रीयस्तरावर राज्यातील खेळाडूंना यश संपादन करताना मर्यादा येत असल्याने महाराष्ट्र शासनाने, आंतरराष्ट्रीय स्तरावर क्रीडा विश्वात वेळोवेळी होणारे बदल विचारात घेऊन व आंतरराष्ट्रीय क्रीडा क्षेत्रात राज्याचा नावलौकीक कायम ठेवण्यासाठी तसेच राज्यातील खेळाडूंनी आंतरराष्ट्रीय स्तरावरील व ऑलिम्पीक स्पर्धेमध्ये दर्जेदार कामगिरी करुन जास्तीत जास्त पदके प्राप्त करण्याच्या दृष्टीने खेळाडूंना क्रीडा विषयक तंत्रशुध्द प्रशिक्षण, दर्जेदार पायाभूत सुविधा, सराव व प्रशिक्षणासाठी पुरेसे साहित्य, प्रशिक्षणाचा कृती आराखडा, खेळाडूंच्या सकारात्मक मानसिकतेसाठी मानसोपचार तज्ञाचे मार्गदर्शन, आहार तज्ञ, मसाजिस्ट, दुखापतीवर इलाजासाठी फिजिओथेरेपिस्ट इत्यादी बाबींचे मार्गदर्शन खेळाडूंना पुरविणेच्या दृष्टीने "मिशन लक्ष्यवेध" या महत्वाकांक्षी योजनेची अंमलबजावणी राज्यामध्ये करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

शासनाच्या वतीने ऑलिम्पिक स्पर्धेमध्ये राज्याचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या खेळाडूंना ऑलिम्पिक स्पर्धेची तयारी करणे करीता यापुर्वी" मिशन ऑलिम्पिक" या योजनेमधून आर्थिक सहाय्य देण्यात येत होते. शासनाने "मिशन लक्ष्यवेध" या योजनेंतर्गत " मिशन ऑलिम्पिक" या योजनेचे समायोजन करण्यात आलेले असल्याने पॅरीस, फ्रान्स येथे आयोजित होणाऱ्या ऑलिम्पिक व पॅरा ऑलिम्पिक स्पर्धेमध्ये महाराष्ट्र राज्याचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या खेळाडूंना ऑलिम्पिक स्पर्धेची तयारी करणे करीता "मिशन लक्ष्यवेध" या योजनेच्या माध्यमातून आर्थिक सहाय्य करण्यात येणार आहे. याकरिता पॅरीस, फ्रान्स येथील ऑलिम्पिक व पॅरा ऑलिम्पिक स्पर्धेकरिता पात्र ठरलेल्या राज्यातील खेळाडूंना आर्थिक सहाय्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पॅरीस, फ्रान्स येथील ऑलिम्पिक व पॅरा ऑलिम्पिक स्पर्धेकरिता पात्र ठरलेल्या राज्यातील खालील खेळाडूंना प्रत्येकी ₹५०.०० लक्ष याप्रमाणे तरतूद वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**ऑलिम्पिक व पॅरा ऑलिम्पिक स्पर्धेसाठी पात्र ठरलेल्या राज्यातील खेळाडूंची यादी**

| अ.क्र. | खेळाडूचे नाव | खेळ प्रकार | आर्थिक सहाय्य (रू.) |
|---|---|---|---|
| १. | श्री. अविनाश साबळे | ॲथलेटिक्स | ५०.०० लक्ष |
| २. | श्री.चिराग शेट्टी | बॅडमिंटन | ५०.०० लक्ष |
| ३. | श्री. विष्णु सर्वानंन | सेलींग | ५०.०० लक्ष |
| ४. | श्री.स्वप्नील कुसाळे | शुटींग | ५०.०० लक्ष |
| ५. | श्री. प्रविण जाधव | आर्चरी | ५०.०० लक्ष |
| ६. | श्री सर्वेश कुशारे | ॲथलेटिक्स | ५०.०० लक्ष |
| ७. | श्रीम. आभा खटुआ | ॲथलेटिक्स | ५०.०० लक्ष |
| ८. | श्री. मानसी जोशी | पॅरा बॅडमिंटन | ५०.०० लक्ष |
| ९. | श्री.सुकांत कदम | पॅरा बॅडमिंटन | ५०.०० लक्ष |
| १०. | श्रीम.भाग्यश्री जाधव | पॅरा बॅडमिंटन | ५०.०० लक्ष |
| ११. | श्री. सुयश जाधव | पॅरा जलतरण | ५०.०० लक्ष |
| १२. | श्री. सचिन खिलारे | पॅरा ॲथलेटिक्स | ५०.०० लक्ष |
| | | **एकूण** | **६००.०० लक्ष** |

२) उपरोक्त निधी खर्च करताना खालील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील -

i) उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

ii) राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/ नियम/शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

iii) सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात यावा.

iV) पात्र खेळाडूंना आर्थिक सहाय्य देण्यापूर्वी सर्व कागदपत्रांची तपासणी/खातरजमा क्रीडा संचालनालयाने करणे आवश्यक राहील.

३) या संदर्भात होणारा खर्च " मागणी क्रमांक ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०९) खेळाडूंना शिष्यवृत्त्या व पुरस्कार, (०९) (०९) राष्ट्रीय स्तरावर क्रीडा व कौशल्य व तंत्र संबधात खास शिक्षणाचा दर्जा वाढविणे (ऑलिम्पिक अभियान) ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर, २२०४-५३६८" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून करण्यात यावा.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग दि.०१/०४/२०२४ मधील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

५) सदर रक्कम आहरित करण्यासाठी लेखा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी लेखा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आहरित करून आर.टी.जी.एस.द्वारे खेळाडूंच्या खात्यावर जमा करावा.

६) सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७८१/व्यय-५. दि.१२/०७/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७) सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१२१६५६२१४२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2024.07.12 17:08:09 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४) अपर मुख्य सचिव (क्रीडा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६) सर्व विभागीय उपसंचालक,
७) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी,
८) निवडनस्ती (क्रीयुसे-२).